राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात क्षेत्रविकास कार्यक्रम राबविण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजुरी बाबत सन २०२१-२२.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : नाक्षेवि -२०२१/प्र.क्र. ८१ /का.९,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दि. २१ जानेवारी, २०२२**

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.७६/का.९, दि. १८ जून, २०१५.
२) शासन पूरकपत्र, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.५/का.९, दि. ९ मार्च, २०१६.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४,जून २०२१.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २९,जुलै २०२१.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४,ऑक्टोबर २०२१.

**प्रस्तावना :-**

अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला असून उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये ही योजना सन २०१५-१६ या वर्षात राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.२ येथील शासन पूरकपत्रान्वये, दि.१८जून,२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील योजनेची कार्यपध्दती या शीर्षाखाली परिच्छेद (ब) (iii) च्या पुढे परिच्छेद दाखल करण्याचा निर्णय शासन मान्यतेने घेतला आहे. त्यानुसार मा. खासदार, मा. आमदार व अन्य मा. लोकप्रतिनिधी यांच्या प्रस्तावांना महानगरपालिका/नगरपालिका/ नगरपंचायत हद्दीमध्ये कामाच्या संख्येची मर्यादा एकापेक्षा जास्त परंतू प्रति काम प्रति वर्षी महानगरपालिकेस कमाल रु. ४० लक्ष, "अ" वर्ग नगरपालिकेस कमाल रु. ३० लक्ष, “ब" व रु.२० लक्ष "क" वर्ग नगर पंचायतींना असू शकेल, अशी तरतूद आहे. मा.खासदार व आमदार व जिल्हाधिकारी यांच्याकडून महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायत यांचे प्राप्त प्रस्तावांना मंजूरी देऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीपैकी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

उपरोक्त संदर्भ क्र.३ व ४ मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनान्वये कोविड-१९ च्या संसर्गजन्य रोगाच्या प्रादूर्भावामुळे सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात राज्याची कर व करेतर उत्पन्नातील अपेक्षित महसूली घट व त्याचे राज्याच्या वित्तियव्यवस्थेवर होणारे परिणाम विचारात घेऊन वर्ष अखेरीपर्यंत निधी वितरण/खर्चाची मर्यादा अर्थसंकल्पीय निधीच्या फक्त ६०% इतकीच राहील.

**शासन निर्णय :-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्र विकास योजनेकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु.५०,४०,००,०००/- (अक्षरी रू. पन्नास कोटी चाळीस लक्ष फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त विभाग शासन निर्णय दि.२४/०६/२०२१ अन्वये कोव्हिड-१९ या विषाणू संसर्गामुळे उद्भवलेला परिस्थितीमुळे, सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात योजनेवरील अर्थसंकल्पित निधीच्या ६०%च्या मर्यादेत निधी वितरण करण्याची मान्यता देण्यात आली आहे. त्यापैकी वित्त विभागाने या योजनेकरिता अर्थसंकल्पित रु.५०,४०,००,०००/- (अक्षरी रू. पन्नास कोटी चाळीस लक्ष फक्त) निधीपैकी ३०% च्या मर्यादेत रु.१५,४०,००,०००/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी चाळीस लक्ष फक्त) इतका निधी (BEAMS) बीम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. मा.मंत्री/ राज्यमंत्री/ खासदार/ आमदार तसेच जिल्हाधिकारी यांच्याकडून शासनास प्राप्त झालेल्या महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायत हद्दीमध्ये विकास कामांच्या प्रस्तावांना, सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीत उपलब्ध तरतूदीपैकी अनुदान वितरीत करण्यासाठी शासनाची मान्यता प्राप्त झालेली आहे. त्यानुसार या शासन निर्णयासोबतच्या **परिशिष्ट-"अ"** मध्ये दर्शविल्याप्रमाणे **एकूण रु.१५,४०,००,०००/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी चाळीस लक्ष फक्त)** एवढा निधी मंजूर करण्यात येत आहे. सदर निधी संबधित महानगरपालिका/म्हाडा/नगरपालिका/नगर पंचायत ज्या जिल्हयांमध्ये स्थित आहेत, त्या जिल्हयांचे जिल्हाधिकारी, यांना स्वाधीन करण्यात येत आहे.

२. संबंधित महानगरपालिका/म्हाडा/नगरपालिका/नगरपंचायतींना मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी, नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. **परिशिष्ट -"अ"** मध्ये दर्शविलेली कामे इतर योजनेतून करण्यात आलेली नाहीत, याची शहानिशा व खातरजमा संबधित जिल्हाधिकारी यांनी करावी व जर सदर काम इतर योजनेतून मंजूर केले असल्यास, त्या बदल्यात सदर योजनेतील इतर काम मंजूर निधीच्या मर्यादेत राहून बदल करण्याचे अधिकार संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना राहतील. उपरोक्त कामाच्या बदल्यात सदर योजनेतील इतर काम करणे शक्य नसल्यास त्यासाठी वितरीत केलेला निधी शासनाच्या कोषागारात तात्काळ जमा करण्यात यावा. तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त कामांचे अंदाजपत्रक बांधकाम विभागाकडून प्राप्त करून घ्यावे. याबाबतची सर्व कागदपत्रे शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार प्राप्त करून घेण्याची कार्यवाही संबधित जिल्हाधिकारी यांनी करावी. त्यानंतर त्यांना प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात यावी व निधी संबंधित महानगरपालिका/म्हाडा/ नगरपालिका/ नगरपंचायत यांना सुपूर्द करण्यात यावा. तसेच सदर कामे महानगरपालिका/ म्हाडा/नगरपालिका/नगरपंचायतीच्यां बांधकाम विभागामार्फत रितसर करुन घेण्यात यावीत.

३. राज्यातील महानगरपालिका/म्हाडा/नगरपालिका/नगरपंचायतींनी मागणी केल्यानुसार ज्या विवक्षित प्रयोजनासाठी निधि मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित महानगरपालिका/म्हाडा/नगरपालिका/नगरपंचायतींना निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित महानगरपालिका/

म्हाडा/नगरपालिका/नगरपंचायतींना सहा महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या **परिशिष्ट "ब"** मध्ये विहित केलेल्या नमुन्यात जिल्हाधिकाऱ्यांनी अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. अल्पसंख्याक नागरी क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील महानगरपालिका/म्हाडा/ नगरपालिका/नगरपंचायतींनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

४. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात क्षेत्रविकास योजनेकरिता सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. "शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील वित्त विभागाच्या दि.२४ जून,२०२१ रोजीच्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४६९१/व्यय-१, दि.२९/०९/२०२१ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे."

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०१२११७४३५३८३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: CN = DINESH MADHAVRAO SONAVANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.01.21 17:49:42 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. संबंधित विभागीय आयुक्त,
१०. आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
११. संबंधित जिल्हाधिकारी,
१२. आयुक्त, संबंधित महानगरपालिका,
१३. मुख्याधिकारी, संबंधित नगरपालिका,
१४. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
१५. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१७. निवडनस्ती ( का-९)

## शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. नाक्षेवि - २०२१/प्र.क्र. ८१/का.९, दि. २१ जानेवारी,२०२२

## परिशिष्ट "अ"

| अ. क्र. | जिल्हा | म.न.पा./न.पा./ न.प. | क्र. | कामाचे नाव | मंजूर निधी (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | **सांगली** | पलूस | १ | पलूस नगरपरिषद हद्दीतील दावल मलिक दर्गा ईदगाह मैदानाचे सुशोभीकरण करणे व संरक्षक भिंत बांधकाम करणे | २५.०० |
| | | कडेगाव | २ | कडेगाव येथे मुस्लिम समाजाकरीता सामाजिक सभागृह बांधणे. | ३०.०० |
| | | | ३ | कडेगाव येथील मुस्लिम समाज दफनभूमीला (निमसोड रोड) संरक्षक भिंत बांधणे व सोईसुविधा पुरवणे | २०.०० |
| | | सांगली | ४ | सांगली मनपा वार्ड क्र.१५ येथील मुजावर फ्लॅट साई गॅरेजच्या बाजूला पि.सी.सी गटार व सिमेंट कॉंक्रीटकरण करणे | ५.०० |
| | | | ५ | सांगली मनपा प्रभाग क्र.१२ मधील पेठबाग मुस्लीम कब्रस्तान येथे सुशोभिकरण करणे. | १०.०० |
| | | | ६ | सांगली मनपा येथील वार्ड क्र.१८ मधील जहीर मस्जिद बाहेरील परिसरातील मस्जिद क्षेत्रासमोर पेव्हींग ब्लॉक बसविणे. | ५.०० |
| | | | ७ | सांगली मनपा येथील वार्ड क्र.१० (ब) मधील मुस्लीम कब्रस्तान येथे सुशोभिकरण करणे | ५.०० |
| | | | ८ | सांगली मनपा हद्दीतील वार्ड क्र.१६ मधील शिराळकर जमादार गल्ली मुबारक घर ते वाहिद बेग घरापर्यंत कॉंक्रीटीकरण रस्ता करणे | ५.०० |
| | | | ९ | सांगली मनपा हद्दीतील प्रभाग क्र.५ मधील शाह रहमटूला दफनभूमी शास्त्री चौक मध्ये पेव्हिंग ब्लॉक बसविणे | ५.०० |
| | | जत | १० | जत येथील मुस्लीम कब्रस्तान विकास कामे | २०.०० |
| | | | ११ | जत येथील कब्रस्तानात पाणी, स्वच्छतागृह, लाईट व्यवस्था करणे | १०.०० |
| | | | १२ | जत येथील जामा मस्जीद बाहेरील परिसरात पेवर ब्लॉक बसविणे | १०.०० |
| | | | १३ | जत येथील अथणी रोड अक्सा मस्जीद समोरील परिसरात कॉंक्रीट रस्ता करणे | १०.०० |
| | | इस्लामपूर | १४ | उरुण इस्लामपूर येथील मुस्लीम समाज इदगाह परिसरामध्ये बहुद्देशीय हॉल बांधणेबाबत | २२५.०० |
| | | | | **जिल्हा सांगली एकूण** | **३८५.००** |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २ | **सातारा** | कराड | १५ | कराड फा. प्लॉ.नं. ३२५ ब/१ येथील मुस्लीम वस्तीत सांडपाण्याची व्यवस्था करणे | १०.०० |
| | | | | **जिल्हा सातारा एकूण** | **१०.००** |
| ३ | **कोल्हापूर** | कोल्हापूर | १६ | कोल्हापूर महानगरपालिका अंतर्गत- विक्रम नगर येथील मुस्लीम समाज वसाहती अंतर्गत रस्ते / काँक्रीटीकरण / गटर्स / सामाजिक सभागृह / संरक्षक भिंत व इतर सोयी सुविधा करणे | १०.०० |
| | | | १७ | कोल्हापूर महानगरपालिका अंतर्गत- टेंबलाईवाडी येथील मुस्लीम समाज वसाहती अंतर्गत रस्ते / काँक्रीटीकरण / गटर्स / सामाजिक सभागृह / संरक्षक भिंत व इतर सोयी सुविधा करणे | १०.०० |
| | | आजरा | १८ | नगर पंचायत तालुका आजरा, येथील मुस्लीम वस्ती मध्ये रस्ता करणे, व दफनभुमी विकास कामे | २५.०० |
| | | | | **जिल्हा कोल्हापूर एकूण** | **४५.००** |
| ४ | **सोलापूर** | सांगोला | १९ | सांगोला शहर, ता. सांगोला येथे इदगाह मैदान संरक्षण भिंत व सुशोभिकरण करणे | २५.०० |
| | | अकलूज | २० | अकलूज नगरपरिषद हद्दीतील मुस्लीम दफनभूमीसाठी संरक्षण भिंत व इतर कामे | २५.०० |
| | | | | **जिल्हा सोलापूर एकूण** | **५०.००** |
| ५ | **पुणे** | सासवड | २१ | सासवड येथील कब्रस्थानाच्या पश्चिम बाजूस सुशोभिकरण करणे | १०.०० |
| | | | २२ | सासवड येथील तांबोळी स्मशानभुमीमध्ये संरक्षक भिंत व वज्जूखाना बांधकाम करणे | १०.०० |
| | | जेजुरी | २३ | जेजुरी येथील कब्रस्तानाला संरक्षण भिंत व सुशोभिकरण करणे | १०.०० |
| | | | २४ | जेजुरी येथील कब्रस्तानाला पेव्हींग ब्लॉक व सुशोभिकरण बसविणे (टप्पा क्र-१ ) | १०.०० |
| | | पिंपरी चिंचवड | २५ | नेहरु नगर येथील ईदगाह व दफनभुमीची संरक्षक भिंत उभारणे व विकास कामे करणे | २५.०० |
| | | राजगुरूनगर | २६ | राजगुरूनगर नगरपरिषद हद्दीतील मुस्लीम समाजाच्या दफनभुमी (कब्रस्थान) साठी संरक्षक भिंत व अंतर्गत रस्ते करणे. | ५५.०० |
| | | पुणे | २७ | वडगांव शेरी मुस्लिम दफनभूमी वडगांव शेरी येथे हायमास्ट लाईट, काँक्रीटीकरण, सांडपाणी व विविध विकास कामे | २५.०० |
| | | | | **जिल्हा पुणे एकूण** | **१४५.००** |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६ | **अहमदनगर** | कोपरगाव | २८ | अक्सा मस्जिद सर्वे नं १०५ परिसरामध्ये सभामंडप व शौचालय बांधणे व विकास कामे करणे | २५.०० |
| | | अहमदनगर | २९ | अहमदनगर महानगरपालिका हद्दीतील प्रभाग क्र. ११ मधील जलाल शहा कब्रस्तान मध्ये हॉल बांधणे व पेवल ब्लॉक बसविणे | २५.०० |
| | | | | **जिल्हा अहमदनगर एकूण** | **५०.००** |
| ७ | **जळगाव** | पाचोरा | ३० | पाचोरा शहरातील मुस्लिम वस्तीत खुले सभागृह बांधकाम करणे | २५.०० |
| | | अमळनेर | ३१ | अमळनेर न. पा. हद्दीत खारोट कब्रस्तान येथे संरक्षण भिंत बांधणे | २५.०० |
| | | | | **जिल्हा जळगाव एकूण** | **५०.००** |
| ८ | **नाशिक** | इगतपुरी | ३२ | प्रभाग क्र.६ वार्ड नं.२ इगतपुरी शहर मुस्लीम कब्रस्तान धम्मगिरी समोर येथे २ कॉक्रीट रस्ते व सुशोभिकरण करणे | १०.०० |
| | | मनमाड | ३३ | मनमाड येथील इदगाह मैदान येथील विकास कामे करणे | २५.०० |
| | | सिन्नर | ३४ | सिन्नर संगमनेर नाका येथील कब्रस्तानास संरक्षक भिंत बांधणे | १०.०० |
| | | | ३५ | सिन्नर येथील कब्रस्तानास जोड रस्ता करणे | १०.०० |
| | | | ३६ | सिन्नर संगमनेर नाका येथील कब्रस्तानात हायमास दिवे बसविणे | ५.०० |
| | | | | **जिल्हा नाशिक एकूण** | **६०.००** |
| ९ | **धुळे** | धुळे | ३७ | धुळे शहरातील देवपूर येथील कब्रस्तान संरक्षण भिंतीचे बांधकाम | २५.०० |
| | | | | **जिल्हा धुळे एकूण** | **२५.००** |
| १० | **नागपूर** | नागपूर | ३८ | ताज अहमद रजा हजरत बाबा ताजुद्दीन ट्रस्ट ताजबाग शरीफा, उमारेड रोड परिसर सुशोभिकरण | १०.०० |
| | | | ३९ | जामा मस्जीद बुटीबोरी येथील बाहेरील परिसरात विविध विकास कामे | १०.०० |
| | | | ४० | हसनबाग येथील कब्रस्तानच्या शेजारी मोठी गटार लाईन टाकणे | १०.०० |
| | | | ४१ | हसनबाग येथील युनुस हाजी यांचे घर ते युनुस किराणा दुकानापर्यंत नाली बांधकाम व सिमेंट रस्त्यांचे बांधकाम करणे | ५.०० |
| | | | ४२ | नागपूर मनपा प्रभाग क्र.११ येथील अराफात कॉलोनी येथे रस्त्याचे काम करणे. | १०.०० |
| | | उमरेड | ४३ | उमरेड, जि.नागपूर या नगर परिषदेस समाजभवन बांधणे. | १०.०० |
| | | | | **जिल्हा नागपूर एकूण** | **५५.००** |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **११** | **भंडारा** | पवनी | ४४ | मुस्लीम कब्रस्तान सेवा समिती, शुक्रवारी वार्ड, पवनी, जि.भंडारा येथील दर्गाह बाहेरील परिसरात सुशोभिकरण करणे. | १०.०० |
| | | साकोली | ४५ | मौजे साकोली येथील प्रभाग क्र. ५ मधील शारदा चौक जवळील मदरसाच्या बाजुला सभागृह बांधकाम करणे | २५.०० |
| | | | | **जिल्हा भंडारा एकूण** | **३५.००** |
| **१२** | **हिंगोली** | कळमनुरी | ४६ | कळमनुरी न. प. हद्दीतील प्रभाग क्र. ३ मधील ताजनगर भागात सिमेंट रस्ता व नाली बांधकाम | २०.०० |
| | | | | **जिल्हा हिंगोली एकूण** | **२०.००** |
| **१३** | **औरंगाबाद** | औरंगाबाद | ४७ | इदगाह, रोझाबाग येथे संरक्षण भिंत बांधणे | २५.०० |
| | | | ४८ | मनपा वार्ड क्र. ११५ सातारा गांव अंतर्गत अबरार कॉलनी येथे इंडियन हॉटेल पासून ते श्री. उस्मान पटेल यांच्या घरापर्यंत सिमेंट रस्त्यांचे बांधकाम करणे | २५.०० |
| | | कन्नड | ४९ | कन्नड नगर परिषदेतील प्रभाग क्र. ६ मध्ये करीमनगर गल्ली नं. ५ इसाक पत्रकार ते सानिया नगर ब्रीज व अस्लमभाई गणी भाई यांचे घरापर्यंत सी.सी. रोड तयार करणे | २५.०० |
| | | | | **जिल्हा औरंगाबाद एकूण** | **७५.००** |
| **१४** | **उस्मानाबाद** | उमरगा | ५० | उमरगा ता. उमरगा येथे हजरत सय्यद बाशा दर्गाह परिसर येथे सामाजिक सभागृह बांधणे. | २५.०० |
| | | उस्मानाबाद | ५१ | मौजे उस्मानाबाद येथील इदगाह मैदान परिसर संरक्षक भिंत बांधणे. | १५.०० |
| | | | ५२ | मौजे उस्मानाबाद येथील इदगाह मैदान परिसर बेड कॉंक्रीट करणे. | १०.०० |
| | | | | **जिल्हा उस्मानाबाद एकूण** | **५०.००** |
| **१५** | **जालना** | जालना | ५३ | जालना नगर परिषद हद्दीतील सदर बाजार इदगाह कब्रस्तान येथे संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे | १०.०० |
| | | | | **जिल्हा जालना एकूण** | **१०.००** |
| **१६** | **नांदेड** | नांदेड | ५४ | प्रभाग क्र. १२ नांदेड वाघाळी शहर येथील इदगाह कब्रस्तानअंतर्गत सी.सी.रोड, संरक्षण भिंत व हायमास इत्यादी कामे. | २०.०० |
| | | नांदेड | ५५ | नांदेड वाघाळा मनपा क्र. १४ अंतर्गत इनामदार कब्रस्तान किल्ला जवळ, महमदिया मस्जीद परिसर येथे संरक्षण भिंत बांधणे / गेट बसविणे / हायमासदिवे / बोअर व आसन व्यवस्था करणे | १०.०० |
| | | | | **जिल्हा नांदेड एकूण** | **३०.००** |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **१७** | **लातूर** | रेणापूर | ५६ | रेणापूर इदगाह दफनभूमी राजेंद्र नगर रोड रस्ता तयार करणे. | १०.०० |
| | | | ५७ | रेणापूर येथे ताकीया बु-हानशहा दफनभूमी पोलीस स्टेशन रोड करणे. | १०.०० |
| | | | ५८ | कब्रसतानास संरक्षक भिंतींचे बांधकाम करणे | २५.०० |
| | | | | **जिल्हा लातूर एकूण** | **४५.००** |
| **१८** | **बुलडाणा** | चिखली | ५९ | चिखली न.प. प्रभाग क्र.०२ रब्बानी टेलर ते सलीम मेहत यांच्या घरापर्यंत दोन्ही बाजूने भूमिगत नाली व रस्ता कॉंक्रीटकरण करणे | १०.०० |
| | | बुलडाणा | ६० | बुलडाणा शहरातील मुस्लिम बांधवांकरीता सार्वजनिक सभागृह बांधकाम करणे | २५.०० |
| | | मेहकर | ६१ | मेहकर नगर परिषद अंतर्गत इमामवाडा येथे शादीखाना बांधकाम करणे | २५.०० |
| | | | | **जिल्हा बुलडाणा एकूण** | **६०.००** |
| **१९** | **ठाणे** | कल्याण डोंबिवली | ६२ | सिध्देश्वर आळी नमक बंद रोड ते जामा मस्जिद रस्ता कॉंक्रीटीकरण | १५.०० |
| | | कल्याण डोंबिवली | ६३ | गफूर डोन चौक येथील अन्सारी चौक ते गफूर डोन चौकापर्यंत रस्ता कॉंक्रीटीरकण करणे | १०.०० |
| | | ठाणे | ६४ | प्रभाग क्रमांक-१० राबोडी, जनरल कब्रस्तान मध्ये शेड बांधणे विविध स्थापत्य कामे करणे | २५.०० |
| | | भिवंडी - निजामपूर | ६५ | भिवंडी निजामपूर शहर महानगरपालिका वॉर्ड क्र.१२ क येथील चिशतीया कब्रस्थान अंतर्गत संरक्षक भिंत व इतर कामे | १५.०० |
| | | | | **जिल्हा ठाणे एकूण** | **६५.००** |
| **२०** | **पालघर** | पालघर | ६६ | पालघर येथील इदगाह मस्जिद कब्रस्तान येथे सभागृह बांधणे | १५.०० |
| | | पालघर | ६७ | पालघर शहरातील बोहरा जमात कब्रस्तान येथे संरक्षण भिंत बांधणे | १०.०० |
| | | | | **जिल्हा पालघर एकूण** | **२५.००** |
| **२१** | **रत्नागिरी** | राजापूर | ६८ | राजापूर येथील कब्रस्तान संरक्षण भिंत बांधणे | १५.०० |
| | | रत्नागिरी | ६९ | मिरकरवाडा कब्रस्तान येथे अंतर्गत रस्ते सांडपाणी व्यवस्थापन व विविध विकास कामे | २५.०० |
| | | | | **जिल्हा रत्नागिरी एकूण** | **४०.००** |
| **२२** | **मुंबई शहर** | मुंबई शहर | ७० | बी ब्लॉक ५ वी गल्ली, सी.बी.वी.मार्ग, कामाठीपूरा येथील अश्रीफ बालवाडी प्लास्टर, कलर, भिंत, व विविध विकास कामे | १०.०० |
| | | | | **जिल्हा मुंबई शहर एकूण** | **१०.००** |
| **२३** | **मुंबई उपनगर** | मुंबई | ७१ | धारावी वडी मस्जीद बाहेरील परिसरात गटारे / पायवाटा व लादीकरण करणे | १०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | ७२ | अंजुम स्टोअर्स जवळ, दामूनगर येथे सभामंडप व लादीकरण करणे | २५.०० |
| | | अंधेरी | ७३ | मसाला चक्की जवळ, मिटपाडा, मरोळ नाका, अंधेरी पूर्व येथे ३ सीट शौचालय बांधणे | ५.०० |
| | | | ७४ | शेख अब्दुल रहेमान चाळ नं. १, गुंदवली गावठाण, लिटल फ्लावर स्कुल शेजारी, अंधेरी (पु.), येथे गटारे/पायवाटा व चेकर टाईल्स बसविणे | ५.०० |
| | | | ७५ | शरीफाबी चाळ,चिमटपाडा, नुरी द जवळ, मरोळ नाका अंधेरी पूर्व येथे ४ सीट शौचालय बांधणे | ५.०० |
| | | | ७६ | लालजी कंपाउंड , मरोळ मिलीटरी रोड, येथे गटारे व पायवाटा करणे | १०.०० |
| | | चेंबूर | ७७ | गरीब भारती रहिवाशी संघ, एन.जी.आचार्य मार्ग येथे लादीकरण व गटारे काम करणे. | २५.०० |
| | | | ७८ | वार्ड क्र. १४५ करबला मैदानाजवळ चिता कॅम्प ट्रॉम्बे येथे अतिरिक्त नागरी सुविधा केंद्र बांधणे | २५.०० |
| | | | ७९ | वार्ड क्र. १४५ करबला मैदानाजवळ चिता कॅम्प ट्रॉम्बे येथे अतिरिक्त नागरी सुविधा केंद्रामध्ये विद्युत व यांत्रीकी सुविधा पुरविणे | १०.०० |
| | | मानखुर्द | ८० | वार्ड क्र १४७ शिवाजी नगर येथे सामाजिक सभागृह बांधकाम करणे | ६०.०० |
| | | घाटकोपर | ८१ | रमाबाई कॉलनी, घाटकोपर येथील गुरुद्वारा श्री. गुरू सिंह सभा येथे सामाजिक सभागृह बांधणे | २०.०० |
| | | | | **जिल्हा मुंबई उपनगर एकूण** | **२००.००** |
| | | | | **एकूण** | **१५४०.००** |
| | | | | **(एकूण अक्षरी रुपये पंधरा कोटी चाळीस लक्ष फक्त)** | |

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: CN = DINESH MADHAVRAO SONAVANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.01.21 17:50:04 +05'30'

**(दि. मा. सोनवणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय ,अल्पसंख्याक विकास विभाग क्र. नाक्षेवि -२०२१ /प्र.क्र.८१ /का.९, दि. २१ जानेवारी, २०२२.**

**परिशिष्ट - "ब"**

**उपयोगिता प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांसाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, **क्र. नाक्षेवि -२०२१ /प्र.क्र.८१ /का.९ दि. २१ जानेवारी,२०२२.** अन्वये वितरित केलेला रु. /- (अक्षरी रु. ) एवढा निधि पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ. | रु. |
| ब. | रु. |
| क. | रु. |
| ड. | रु. |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधि मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

**तपासणी केलेल्या दस्तऐवज /अभिलेखांचे प्रकार :-**

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)
२. मोजणी पुस्तके (Measurement Books)
३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)
४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका यांची स्वाक्षरी | संबंधित महानगरपालिका / नगरपालिका ज्या जिल्हयात स्थित आहेत त्या जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |

*****